**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील सचिव (वस्त्रोद्योग) स्थित असलेल्या कार्यालयीन दालन क्रमांक ३१३ विस्तार मधील सर्व खिडक्यांना Polyester Curtain Roller Blind पडदे बसवून देण्याच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणे व निधी वितरित करणेबाबत.. ..**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. सववि(पडदे)-२०१८/प्र.क्र.५८४/आस्था-०२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : १८ नोव्हेंबर, २०१९**

<u>संदर्भ</u> :- (१) कार्यकारी अभियंता,इलाखा शहर, मुंबई-१ यांचे पत्र क्र.इशवि/ प्रशा/द./१२८१७, दि.२७.११.२०१८
(२) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाचे कार्यादेश क्र.दुरुस्ती२०१८/प्र.क्र.५८४/आस्था-२ दिनांक ३.१२.२०१८
(३) शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सववि(पडदे)-२०१८/प्र.क्र.५८४/आस्था-०२ दि.८.१.२०१९
(४) कार्यकारी अभियंता,इलाखा शहर, मुंबई-१ यांचे पत्र क्र.काअ/इशवि/ लेखा/बजेट/३३०१, दि.२३.३.२०१९
(५) कार्यकारी अभियंता,इलाखा शहर, मुंबई-१ यांचे पत्र क्र.इशवि/ आस्था/द./११७०५, दि.३०.१०.२०१९

**<u>प्रस्तावना</u> :-**

मा. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे कार्यालयीन दालन क्रमांक ३१३ (विस्तार) मधील सर्व खिडक्यांना Polyester Curtain Roller Blind पडदे बसवून देण्याच्या घेण्याबाबत कार्यकारी अभियंता, मुंबई इलाखा शहर, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई-१, यांचेकडून अनुक्रमांक १ येथील दिनांक २७.११.२०१८ च्या पत्रान्वये सदर कामाकरिता सादर करण्यात आलेल्या **एकूण रु.२७,११०/- GST सह (रुपये सत्तावीस हजार एकशे दहा फक्त)** एवढया अंदाजपत्रकीय खर्चास अनुक्रमांक ३ येथील शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.सववि(पडदे)-२०१८/प्र.क्र.५८४/आस्था-०२ दि.८.१.२०१९ अन्वये प्रशासकीय मान्यता देऊन रु.२७,११०/- इतका निधी वितरित करण्यात आला. त्यानंतर अनुक्रमांक ४ येथील दिनांक २३.३.२०१९ च्या पत्रान्वये कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग (सा.बां.वि.), मुंबई यांनी लोकसभा निवडणूक २०१९ आचारसंहिता दिनांक १०.३.२०१९ पासून लागू झाल्यामुळे तांत्रिक प्रक्रिया व निविदा प्रक्रिया होऊ न शकल्याचे नमूद करून सदर कामासंदर्भात संकेतांक क्रमांक ७१०१९०३६९६ या विभागाकडून वितरित करण्यात आलेला निधी या विभागास ३४५१०३०४ अंतर्गत १३ कार्यालयीन खर्च या उपलेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षामध्ये समर्पित (surrender) केला. त्यानंतर आता कार्यकारी अभियंता, मुंबई इलाखा शहर, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई-१, यांचेकडून अनुक्रमांक ५ येथील दिनांक ३.१०.२०१९ च्या पत्रान्वये संबंधित स्थापत्य कामाची तांत्रिक व निविदा प्रक्रिया पूर्ण होऊन कामही पूर्ण झालेले असल्यामुळे गेल्या आर्थिक वर्षात समर्पित केलेले रु.२७,११०/- इतके अनुदान सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये पुन:श्च उपलब्ध करून देण्याची विनंती करण्यात आलेली आहे. त्यास अनुसरून सदर कामाकरिता सादर करण्यात आलेल्या **एकूण रु.२७,११०/- GST सह (रुपये सत्तावीस हजार एकशे दहा फक्त)** एवढया अंदाजपत्रकीय खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची व सन २०१९-२० या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

विषयांकित बाबीसंदर्भात संदर्भीय शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सववि(पडदे)-२०१८/प्र.क्र.५८४/आस्था-०२ दि.८.१.२०१९ याद्वारे रद्द करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये, मा. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे कार्यालयीन दालन क्रमांक ३१३ (विस्तार) मधील सर्व खिडक्यांना Polyester Curtain Roller Blind पडदे बसवून घेण्याबाबत मा. सचिव (वस्त्रोद्योग) यांनी निर्देशित केल्यानुसार सदर दुरुस्तीची कामे या विभागाचे कार्यादेश क्रमांक दुरुस्ती२०१८/ प्र.क्र.५८४/आस्था-२ दिनांक ३.१२.२०१८ अन्वये कार्यकारी अभियंता, मुंबई इलाखा शहर, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई-१, यांचेकडे सुपूर्द करण्यात आले. याकरिता त्यांचेकडून सादर करण्यात आलेल्या **एकूण रु.२७,११०/- GST सह (रुपये सत्तावीस हजार एकशे दहा फक्त)** एवढया अंदाजपत्रकीय खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. उक्त काम समाधानकारकरित्या पूर्ण केल्याबाबतचा अहवाल मा. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक यांनी दिनांक १३ डिसेंबर, २०१८ रोजी या कार्यासनाकडे सादर केलेला असून त्यास अनुसरून मान्य करण्यात आलेला अंदाजपत्रकीय निधी उपलब्ध करून देण्याबाबत शाखा अभियंता, सा. बां. सेवा केंद्र, मंत्रालय, मुंबई यांनी त्या अहवालावरच विनंती केलेली आहे. त्यास अनुसरून याच शासन निर्णयान्वये, सदर कामासाठी लागणारा **रु.२७,११०/- GST सह (रुपये सत्तावीस हजार एकशे दहा फक्त)** एवढा निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीद्वारे, आहरण व संवितरण अधिकारी **संकेतांक क्रमांक ७१०१९०३६९६** यांना वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

४. या प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्र. खर्च "मागणी क्र.व्ही-२-३४५१-सेक्रेटरिएट आर्थिक सेवा , (०९०)-सचिवालयीन, ०१ सचिवालयीन आर्थिक सेवा, (०१) (०१) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (दत्तमत) (३४५१ ०३०४) १३ कार्यालयीन खर्च " या लेखाशिर्षाखाली खर्ची घालून तो सन २०१९-२०२० च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरिता श्री. र. गं. बोड्डू , कार्यासन अधिकारी (रोखशाखा), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच डॉ. सुदिन गायकवाड , उप सचिव (रोखशाखा), सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या ज्ञापनान्वये मंजूर केलेली रक्कम अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई येथून आहरित करुन संबंधितांना वितरीत करण्याची कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी तसेच नियंत्रण अधिकारी यांनी करावी.

६. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, भाग पहिला, उपविभाग- एक ते पाच नियमपुस्तिकेतील **अनुक्रमांक ३५ नियम क्रमांक ८९ अन्वये कार्यालयातील फर्निचरच्या दुरुस्तीच्या आणि अनुक्रमांक ३७ नियम क्रमांक ९० अनुसार** जुन्या **कार्यालयामध्ये फर्निचर विकत घेण्याच्या** अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय शक्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१११८१६३५०६४२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sudin Gaikwad

Digitally signed by Sudin Gaikwad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Operation Marketing and Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=20315cd32e197cc2334676dbe1f09f90b2334eddf7e75d09609003b414273f73, serialNumber=8ff188a569f4a95d2f0ce8ca61e60d8aa5f51a1bf65b42dd49bb26d165941d9e, cn=Sudin Gaikwad
Date: 2019.11.18 16:44:38 +05'30'

**( डॉ. सुदिन गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. कार्यकारी अभियंता,इलाखा शहर, सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, दुसरा मजला, २६, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई ४०० ००१,

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, ( मुंबई/ नागपूर )
२. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य-१/२, ( मुंबई/ नागपूर )
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई
५. आहरण व संवितरण अधिकारी, रोखशाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई-४०००३२
६. सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७. निवडनस्ती, आस्था-०२, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मुंबई-४०००३२.